मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या परिवहन समिती सभेने दि. १७.०८.२०२० रोजी पारित केलेला ठराव क्र.०८ व दि.१२.१०.२०२० रोजी पारीत केलेले ठराव क्र.१० निलंबित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- मिभाम-११२०/प्र.क्र.५५/नवि-२८**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक:- १८ नोव्हेंबर, २०२०**

संदर्भ:- १) मिरा-भाईंदर महानगरपालिका परिवहन समिती सभा ठराव क्र.०८, दि.१७.०८.२०२० व ठराव क्र.१०, दि.१२.१०.२०२०.

२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/१६९/२०२०, दि.०६.११.२०२०.

**प्रस्तावना:-**

मिरा-भाईंदर महानगरपालिका परिवहन उपक्रमाच्या बसेस प्रवर्तनासाठी PPP तत्वावर मे.भागीरथी ट्रान्स कॉर्पो प्रा.लि. यांची बस ऑपरेटर म्हणून नियुक्ती करण्यास मा.स्थायी समिती सभेने ठराव क्र.२२, दि.११.०६.२०१९ अन्वये मंजुरी दिलेली आहे. मे. भागिरथी एमबीएमटी प्रा.लि. यांना महानगरपालिकेकडून मंजूर दराने VGF पोटी देयक अदा करण्यात येते. तसेच प्रवासी बस तिकिटांपासून मिळणारे उत्पन्नही त्यांनाच मिळत असते. कोविड-१९ मुळे दि.२२.०३.२०२० पासून लॉकडाऊन सुरू झाल्याने प्रवाश्यांसाठी बस प्रवर्तन बंद करण्यात आले आहे. तथापि, दि.२३.०३.२०२० पासून महानगरपालिका अत्यावश्यक सेवेतील अधिकारी, कर्मचारी, महानगरपालिकेचे अधिकारी, कर्मचारी यांना ने-आण करण्यासाठी मागणीप्रमाणे बसेस उपलब्ध करून सेवा दिलेली आहे.

कोविड-१९ लॉकडाऊन कालावधीमध्ये बस ऑपरेटर मे.भागिरथी एमबीएमटी प्रा.लि. यांनी चालविलेल्या बस सेवेसाठी चालविलेल्या कि.मी. करिता दि.३१.०७.२०१९ रोजीचे करारानुसार मंजूर दराने VGF ची रक्कम अदा करण्यात आलेली आहे.

मात्र, कोविड-१९ लॉकडाऊन कालावधीमध्ये बस ऑपरेटर यांचेमार्फत अत्यावश्यक सेवेतील अधिकारी/कर्मचारी, तसेच परराज्यातील प्रवाश्यांकरिता विशेष रेल्वे गाड्यांपर्यंत प्रवाश्यांना पोहोचविणेकरिता बसेस चालविल्या असून, बस ऑपरेटर यांना तिकिटांपासून उत्पन्न मिळालेले नाही. तिकिटांपासून उत्पन्नासाठी भरपाई अथवा देयक देण्याची तरतूद करारनाम्यात नसल्याने VGF व्यतिरिक्त रक्कम अदा करण्याबाबत आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी मा.परिवहन समिती सभा दि.१०.०८.२०२० प्रकरण क्र.०६ अन्वये प्रस्ताव निर्णयार्थ सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावामध्ये तिकिटाचे उत्पन्नासाठी बस ऑपरेटर यांचे पुर्वीचे तिकिटाचे उत्पन्नाची सरासरी विचारात घेऊन, रु.२३.९६ प्रती कि.मी. तसेच लॉकडाऊन कालावधी व कोविड-१९ मुळे झालेला वाढीव खर्च १) अतिकालीन भत्ता रु.२.१९ प्रती कि.मी., २) सॅनिटायझेशन खर्च कागदपत्रे सादर केल्यावर रु.०.८३ प्रती कि.मी. प्रत्यक्ष चालविलेल्या कि.मी. करिता अदा करणे उचित राहील, असे प्रस्तावात नमूद करण्यात आले होते. तसेच ज्या बसेस चालविलेल्या नाहीत व न चालविलेले कि.मी. साठी देयक अदा करणे उचित होणार नाही, असे ही नमूद करण्यात आले होते.

मिरा-भाईंदर महानगरपालिका परिवहन समिती सभा दि.१७.०८.२०२०, ठराव क्र.०८ अन्वये बस ऑपरेटर यांना लॉकडाऊन कालावधीतील चालविलेल्या बस सेवेसाठी मूळ करारनाम्यातील मंजूर दराने VGF रक्कम व तिकिट उत्पन्नाची सरासरी प्रती कि.मी. रु.२९.२६ देण्याचा तसेच न चालविलेल्या बस गाड्यांसाठी सरासरी प्रति.कि.मी. रु.३३.१६ इतका मोबदला देण्यास मंजुरी दिलेली आहे.

तद्नंतर या बाबीचा फेरविचार करण्याची आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी परिवहन समितीला विनंती केली असता, त्यांनी ठराव क्र.१०, दि.१२.१०.२०२० अन्वये पुर्वीच्या ठराव क्र. ०८ ची अंमलबजावणी करण्याची सूचना केली आहे.

२. सदर ठरावाची अंमलबजावणी केल्यास महानगरपालिकेस मोठा आर्थिक भार पडत असल्याने तसेच परिवहन समितीने दि.१७.०८.२०२० रोजी पारीत केलेला ठराव क्र.०८ व दि.१२.१०.२०२० रोजी पारीत केलेला ठराव क्र.१० हे महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ अन्वये शासनास असलेल्या अधिकाराचा वापर करून विखंडीत करण्याची आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी शासनास विनंती केली आहे.

३. आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांची शिफारस विचारात घेता, मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या परिवहन समिती सभेने पारित केलेले ठराव क्र.०८, दि.१७.०८.२०२० व ठराव क्र.१०, दि.१२.१०.२०२० हे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१(१) अनुसार निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या परिवहन समिती सभेने पारित केलेले ठराव क्र.०८, दि.१७.०८.२०२० व ठराव क्र.१०, दि.१२.१०.२०२० हे महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (१) नुसार निलंबित करण्यात येत आहेत. याबाबत संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास त्यांनी ३० दिवसांत सादर करावे. विहीत मुदतीत अभिवेदन सादर न झाल्यास अधिनियमाच्या कलम-४५१ (३) नुसार पुढील आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२०१११८१५२३५६७४२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Navnath Ravaji Wath

Digitally signed by Navnath Ravaji Wath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=885bfbac1d8ef74e3ffe622f226b31d75c2a13f319632f0da72fd54e57ac00ff, serialNumber=30e05bf6f1ed11d82b5689c9fc6b47a271a6b22790a9388dba7f3db15e247ff5, cn=Navnath Ravaji Wath
Date: 2020.11.20 15:58:28 +05'30'

**( नवनाथ रा. वाठ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) महापौर, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
५) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
६) प्रधान सचिव ( नवि-२ ) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) निवडनस्ती ( नवि-२८ ).